डेक्कन कॉलेज पदव्युत्तर व संशोधन संस्था, पुणे विद्यापीठासाठी अत्यावश्यक शैक्षणिक व वैज्ञानिक उपकरणे, विविध यंत्रसामुग्री इ. ची खरेदीच्या अनुषंगाने उर्वरित निधी वितरीत करण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन

## उच्च व तंत्र शिक्षण विभाग

**शासन ज्ञापन क्रमांक:- डीसीयु-२०२३/ई-८९७२१०(१)/विशि-२**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : १२ फेब्रुवारी, २०२५.

**संदर्भ :-** १. शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र.डीसीयु-२०२३/प्र.क्र.११/विशि-२ दि.१५.०२.२०२३ व दि.२७.०६.२०२३.

२. शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र.डीसीयु-२०२३/प्र.क्र.११/विशि-२ दि.०५.०७.२०२३ व दि.२९.०१.२०२४ दि.१५.०३.२०२४.

३. कुलसचिव डेक्कन कॉलेज पदव्युत्तर व संशोधन संस्था, पुणे यांचे पत्र क्र.७२७/जीसी/यै.उ.यंत्रसामुग्री दि.२८.०९.२०२४ रोजीचे पत्र.

**ज्ञापन :-**

डेक्कन कॉलेज पदव्युत्तर व संशोधन संस्था, पुणे विद्यापीठासाठी विविध विभागांना उपकरणे व यंत्रसामुग्रीची खरेदी करण्यासाठी च्या संदर्भ क्र.१ येथील दि.२७.०६.२०२३ शासन निर्णयान्वये रु.९,३३,९६,९५०/- इतक्या किंमतीच्या खरेदीस प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये वरील खरेदी प्रक्रिया करण्यासाठी रु.८,५०,००,०००/- एवढा निधी वितरीत करण्यात आला आहे. आता खरेदी करण्यात आलेल्या सामुग्रीचे देयक प्रलंबित असून, उर्वरित निधी वितरीत करण्याची संदर्भ क्र.३ येथील पत्रान्वये विनंती केली आहे. सदर विनंतीस अनुसरुन वित्त विभागाने निधी वितरीत करण्यास मान्यता दिल्यानुसार डेक्कन कॉलेज पदव्युत्तर व संशोधन संस्था, पुणे विद्यापीठासाठी खरेदी करण्यात आलेल्या यंत्रसामुग्रीचे देयक अदा करण्यासाठी उर्वरित निधी रु.८३,९६,०००/- (अक्षरी रुपये त्र्याऐंशी लक्ष शहाण्णव हजार फक्त) एवढा निधी पुढील अटींच्या अधीन वितरीत करण्यास मंजूरी देण्यात येत आहे :-

१. संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयात नमूद केलेल्या अटींचे पालन करण्याची जबाबदारी विद्यापीठाची राहील.

२. प्रशासकीय किंमतीच्या मर्यादेतच खर्च भागविण्याची जबाबदारी सर्वस्वी विद्यापीठाची राहील.

३. विद्यापीठास ज्या उद्दिष्टासाठी मंजुर केलेल्या अनुदानाचा वापर त्याच उद्दिष्टासाठी करावा.

४. विहीत कालावधीमध्ये सदरचा खर्च पूर्णपणे करण्यात येईल याची दक्षता घेण्यात यावी.

५. सदरहू रक्कमेचे विनियोग प्रमाणपत्र (Utilization Certificate) संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांचेमार्फत शासनास विहित वेळेत सादर करण्यात यावे.

६. वरील अनुदानाची सर्व कागदपत्रे व हिशेब महालेखापाल, महाराष्ट्र-१ किंवा प्रकरणपरत्वे महालेखापाल-२ नागपूर यांनी सदर कामाकरीता प्राधिकृत केलेले अधिकारी यांना तपासण्याचे अधिकार असून, त्यांनी मागणी केल्यास, सर्व कागदपत्रे त्यांच्याकडे तपासणीकरीता विद्यापीठाने सादर केली पाहिजेत.

२. सदरहू मंजूर झालेली तरतूद **तातडीने** डेक्कन कॉलेज पदव्युत्तर व संशोधन संस्था, पुणे विद्यापीठास उपलब्ध करुन देण्याची जबाबदारी संचालक (उच्च शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांची राहील.

३. सदर खर्च "मागणी क्रमांक - डब्ल्यु-२, प्रधानशिर्ष- २२०२- सर्वसाधारण शिक्षण, ०३- विद्यापीठीय व उच्च शिक्षण, १०२- विद्यापीठांना सहाय्य, - (००) (२१) डेक्कन कॉलेज पदव्युत्तर व संशोधन संस्था, पुणे या संस्थेचा विकास (२२०२ ०९१४), ३१ सहाय्यक अनुदाने" या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२०२५ मधील मंजूर तरतूदीतून खर्ची टाकण्यात यावा.

४. सदर शासन ज्ञापन, महाराष्ट्र विनियोजन अधिनियम २०२४, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/ अर्थ-३ दि.२५.०७.२०२४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे. या शासन परिपत्रकातील परिशिष्ट मधील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे.

५. सदर शासन ज्ञापन वित्त विभागाच्या सहमतीने (अनौपचारिक संदर्भ क्र.९०/व्यय-५ दि.२३.०१.२०२५) निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२५०२१२१६३१२३१३०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

PRATAP PANDURANG LUBAL

Digitally signed by PRATAP PANDURANG LUBAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=b0d6763338fc6cc4f7cf07ca60db7abc1cfac99c84ab1b5bfc0dae4609d631d0, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AF6895C47A84066432F5BDD1F182B4163D880AC9BD8D24A198FD0E7310BBEB59, cn=PRATAP PANDURANG LUBAL
Date: 2025.02.12 16:33:39 +05'30'

**( प्रताप पां लुबाळ )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल तथा कुलपती यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा.मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव (नियोजन), मंत्रालय, मुंबई.

६. अपर मुख्य सचिव (उच्च व तंत्र शिक्षण), मंत्रालय, मुंबई.

७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / लेखापरीक्षा, महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.

८. महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.

९. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे

१०. कुलसचिव, डेक्कन कॉलेज पदव्युत्तर व संशोधन संस्था, पुणे.

११. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.

१२. अवर सचिव (अर्थसंकल्प शाखा), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई

१३. निवडनस्ती (विशि -२), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.